**नाशिक विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा, वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मध्ये तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्त्या देणे.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांकः मविसे-१०/२०१४/प्र.क्र.३५/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: २६ डिसेंबर, २०१४

**संदर्भः-**

**शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांकः मविसे१०/२०१४/प्र.क्र.३५/ आस्था-३अ, दिनांक १२ मे, २०१४**

**आदेश:-**

उपरोक्त संदर्भाधीन आदेशान्वये नाशिक विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा, वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब या संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+४४०० ग्रेडवेतन या वेतनश्रेणीत तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्ती (तदर्थ पदोन्नतीने) देण्यात आली आहे. सदर पदोन्नती प्रस्तावातील लिपिक संवर्गातील, श्री.सी.टी.गोस्वामी यांच्याविरुध्द सुरु असलेल्या विभागीय चौकशीचा अंतिम निर्णय झाला असून त्यांच्यावर ठपका ठेवून सदर प्रकरण निकाली काढण्यात आले आहे. त्यामुळे श्री.गोस्वामी यांना महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मध्ये पदोन्नती देण्यास सामान्य प्रशासन विभागाने सहमती दिली असल्याने त्यांना महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+४४०० ग्रेडवेतन या वेतनश्रेणीत तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्ती (तदर्थ पदोन्नतीने) देण्यात येत आहे. निवडीने नियुक्तीनंतर त्यांची नेमणूक खालीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | नाव | सद्याचे पद | निवडीने नियुक्तीनंतरचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.सी.टी.गोस्वामी | कक्ष अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार | सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चोपडा, जिल्हा जळगांव | रिक्त पदी |

२. श्री.गोस्वामी यांना सरळसेवेच्या कोट्यावर तात्पुरत्या स्वरुपात, तदर्थ पदोन्नतीने देण्यात आलेली नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) सदर तदर्थ पदोन्नती ११ महिने अथवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होतील, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहिल. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार प्राप्त झाल्यास, तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यास पदावनत करण्यांत येईल. सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबधित अधिकाऱ्याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

ब) सदर तदर्थ पदोन्नती सरळसेवेच्या कोटयातील पदावर देण्यात येत असल्याने ती तात्पुरत्या स्वरुपाची असून, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

क) सदर तदर्थ पदोन्नती ही संबंधित अधिकाऱ्याने महाराष्ट्र विकास सेवा विभागीय परीक्षा नियम, १९९१ व सुधारणा नियम, १९९८ मधील तरतूदीनुसार विहित मुदतीत परीक्षा उत्तीर्ण होण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे. अन्यथा ते पदावनतीस पात्र ठरतील.

ड) सदर तदर्थ पदोन्नती शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१०८७/ २००/प्र.क्र.३/८७/१२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतूदीच्या अधीन राहील.

इ) सदर तदर्थ पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

ई) सदर तदर्थ पदोन्नती ही मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्र. ८४५२ / २००४ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

प) सदर तदर्थ पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन शासन निर्णयाच्या अधीन राहील.

३. निवडीने नियुक्त झालेल्या पदोन्नत कर्मचाऱ्याने, त्याच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको असे समजून, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही १०८७/११३१/प्र.क्र.११/८९/१२, दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांची केलेली निवडीने नियुक्ती रद्द करण्यात येईल.

४. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी निवडीने नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यास स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन, तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन

नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितास सूचना दयाव्यात. तसेच संबंधित कर्मचाऱ्याने पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

५. निवडीने नियुक्त्या दिलेल्या पदोन्नत कर्मचाऱ्याने त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे, त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक: सीडीआर १०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाई पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२२९१२३२५८१८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2014.12.29 15:02:07 +05'30'

**(वि.द.शिंदे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
२. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
४. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार/ जळग़ांव
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार/ जळग़ांव
७. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक
८. संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
९. कार्यासन क्रमांक आस्था-२/आस्था-३ /योजना-५, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.